**पर्यटन धोरण, २०१६ अंतर्गत विशाल पर्यटन प्रकल्पाचा (Mega Project Unit) दर्जा देण्याबाबत- मे.अलिबाग रिसॉर्टस अँड हॉटेल्स एल.एल.पी. यांच्या पर्यटन प्रकल्पाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टीडीसी २०१७/६/प्र.क्र. ६२६/पर्यटन,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ नोव्हेंबर, २०१८.

वाचा : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक- टिडीसी २०१५/११/प्र.क्र. १०२१/ पर्यटन, दिनांक ४.५.२०१६.
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक- टिडीसी २०१५/८/प्र.क्र. ९९२/पर्यटन, दिनांक ४.८.२०१७.

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक- टिडीसी २०१५/११/प्र.क्र. १०२१/पर्यटन, दिनांक ४.५.२०१६ अन्वये महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ ला मान्यता देण्यात आलेली आहे. महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ मध्ये परिच्छेद क्रमांक- ५.५ नुसार पात्र घटक देण्यात आलेले आहेत. परिच्छेद क्रमांक- ६ मध्ये आर्थिक प्रोत्साहन क्रमांक- ६.१.१ विशाल प्रकल्पाचे वर्गीकरण व त्यांचे निकष देण्यात आलेले आहेत. त्यानुसार विशाल प्रकल्पातील “क” वर्ग क्षेत्र वर्गीकरणासाठी भारतीय रुपयांमधील स्थिर भांडवली गुंतवणूक- रुपये २५.०० कोटी, प्रत्यक्ष रोजगार निर्मिती- ७५ व गुतवणूकीचा कालावधी- ४८ महिने, असे विहीत केलेले आहेत. पर्यटन धोरण २०१६ च्या परिच्छेद क्रमांक- ६ नुसार पर्यटन प्रकल्पांना Mega Project Unit व Ultra Mega Project म्हणून मान्यता देण्यासाठी, अधिक प्रोत्साहने/ सवलती मंजूर करण्यासाठी आणि अटी व शर्तीमध्ये सूट देण्यासाठी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीची स्थापना करण्यात आलेली आहे.

मे.अलिबाग रिसॉर्टस अँड हॉटेल्स एल.एल.पी. या पर्यटन प्रकल्पास विशाल प्रकल्प म्हणून मान्यता देण्याबाबत (Mega Project Unit) निर्णय घेण्यासाठी ह्या उच्चाधिकार समितीची दिनांक २१.८.२०१८ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत उच्चाधिकार समितीने, मे.अलिबाग रिसॉर्टस अँड हॉटेल्स एल.एल.पी. पर्यटन प्रकल्पास महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ नुसार विशाल प्रकल्प (Mega Project Unit) म्हणून मान्यता देण्याचा निर्णय घेतला. यानुसार मे.अलिबाग रिसॉर्टस अँड हॉटेल्स एल.एल.पी. पर्यटन प्रकल्पास महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ नुसार विशाल प्रकल्पाचा (Mega Project Unit) दर्जा देण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मे.अलिबाग रिसॉर्टस अँड हॉटेल्स एल.एल.पी. यांच्या मौजे नंदीपाडा, ता.अलिबाग, जि.रायगड येथील २४ एकर जागेत पंचतारांकित हॉटेलचा पर्यटन प्रकल्प उभारणार आहे. या प्रकल्पात प्रस्तावित भांडवली गुंतवणूक अंदाजे रुपये ५००.०० कोटी व ४५० व्यक्तींसाठी रोजगार निर्मिती होणार आहे. ही बाब विचारात घेता महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ नुसार हा प्रकल्प विशाल प्रकल्पाचे (Mega Project Unit) निकष पूर्ण करित आहे. महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ अंतर्गत स्थापन केलेल्या मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दिनांक २१.८.२०१८ रोजीच्या बैठकीतील निर्णय विचारात घेऊन मे.अलिबाग रिसॉर्टस अँड हॉटेल्स एल.एल.पी. यांच्या मौजे नंदीपाडा, ता.अलिबाग, जि.रायगड येथील २४ एकर जागेत

पंचतारांकित हॉटेलच्या पर्यटन प्रकल्पास महाराष्ट्र पर्यटन प्रकल्प २०१६ नुसार विशाल प्रकल्प (Mega Project Unit) म्हणून दर्जा देण्यास खालील अटींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

a) The project is declared as Mega Project with 10% enhancement in IPS and a two year extention in the eligibility period as prescribed in the policy.
b) Undertaking would need to approach UD and competent planning authority separately for resolution of issues pertaining to FSI and height restrictions.

२. महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ अंतर्गत विहीत केलेले निकष अथवा अटी/ शर्ती/ नियम यांचा भंग झाल्यास वरील प्रकल्पास महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ नुसार विशाल प्रकल्प (Mega Project Unit) म्हणून दिलेली मान्यता आपोआप रद्द होईल.

३. महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ नुसार विशाल प्रकल्प (Mega Project Unit) म्हणून दिलेली मान्यता ही इतर कोणत्याही अधिनियम, नियमांतर्गत आवश्यक असलेल्या अनुज्ञप्त्या/ ना-हरकत प्रमाणपत्र/ परवानग्या इत्यादी मान्यतेस पर्याय नसेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१११२१६२३०१३६२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae5e5678dc8c9d9c01f7043448a53f6a9fbe81e46d183af43c9a9e01eb42c7c7, serialNumber=93c11f919f0c5fba6953b4841cc8cfd46b2b788da139e3f21b3d79d2cf976efa, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2018.11.12 16:28:10 +05'30'

(र. ल. लखोटे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्ष नेता (विधानपरिषद/ विधानसभा), महाराष्ट्र विधानमंडळ.
२) सर्व मा.विधानपरिषद सदस्य.
३) सर्व मा.विधानसभा सदस्य.
४) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
५) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
६) मा.मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव.
७) मा.राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव.
८) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव.
९) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग.
१०) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग.
११) प्रधान सचिव (१), नगर विकास विभाग.
१२) प्रधान सचिव (उद्योग).
१३) प्रधान सचिव (ऊर्जा).
१४) प्रधान सचिव (सार्वजनिक बांधकाम).
१५) प्रधान सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग.
१६) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.

१७) महालेखापाल, महाराष्ट्र १/ २ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
१९) महासंचालक, माहिती व जसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२०) विक्रीकर/ वस्तु व सेवा कर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२१) उद्योग आयुक्त, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२२) जिल्हाधिकारी (उपनगरे), मुंबई.
२३) मे.अलिबाग रिसॉर्टस अँड हॉटेल्स लि.
२४) निवडनस्ती (पर्यटन).